**भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत BOT तत्वावर बांधण्यात येणाऱ्या राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६० वरील नाशिक फाटा- खेड आठ पदरी उन्नत मार्गासाठी १४.१ हे. भूसंपादन करणे व या प्रकल्पाचा महाराष्ट्र शासनास प्राप्त होणाऱ्या राज्य वस्तु व सेवा कर (State GST) आणि स्वामित्व शुल्का इतके (Royalty) वित्तीय सहाय्य राज्य शासनामार्फत उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बैठक-२०२४/प्र.क्र.३५६/राम-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक १७ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना:-**

दिनांक ०९.०५.२०२३ रोजी मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य व मा. केंद्रीय मंत्री (रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय) यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्यातील विविध राष्ट्रीय महामार्गांच्या अनुषंगाने आढावा बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये उन्नत मार्गांची आवश्यकता व उन्नत मार्गांसाठी मोठ्या प्रमाणातील निधीची आवश्यकता व शहरी भागांमध्ये राष्ट्रीय महामार्गाच्या पथकर धोरणानुसार पथकर वसूलीबाबतच्या अडचणी विचारात घेऊन महाराष्ट्र राज्यातील पुणे व नाशिक विभागातील विविध उन्नत मार्गांसाठी महाराष्ट्र शासनाकडून प्रकल्पासाठी आवश्यक भूसंपादन व अर्थसहाय्य देण्याबाबत सविस्तर चर्चा झाली. सविस्तर चर्चेअंती महाराष्ट्र शासनामार्फत या प्रकल्पांसाठी आवश्यक भूसंपादन व या प्रकल्पातून महाराष्ट्र शासनास उपलब्ध होणारा वस्तु व सेवा कर रक्कम आणि स्वामित्व शुल्क रक्कमे इतक्या निधीचे अर्थसहाय्य भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणास उपलब्ध करुन देण्याचा निर्णय झाला .

त्यास अनुसरुन अध्यक्ष, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांनी त्यांच्या दिनांक १४.११.२०२४ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६० वरील नाशिक फाटा- खेड आठ पदरी उन्नत मार्गाच्या BOT तत्वावरील प्रकल्पाची निविदा मागविण्यात आली असून प्रकल्पासाठी आवश्यक १०० % जमिन ताब्यात आल्यानंतर निविदेबाबत पुढील कार्यवाही करण्याच्या अटीस अधीन राहुन केंद्र शासनाने दिनांक ०३.०८.२०२४ रोजी प्रकल्पास मान्यता दिली असल्याचे कळविले. त्यास अनुसरुन भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणाने राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६० वरील नाशिक फाटा- खेड आठ पदरी उन्नत मार्गासाठी (८ laned Elevated Corridor) महाराष्ट्र शासनामार्फत या प्रकल्पांसाठी आवश्यक भूसंपादन व या प्रकल्पातून महाराष्ट्र शासनास उपलब्ध होणारा वस्तु व सेवा कर रक्कम आणि स्वामित्व शुल्क रक्कमे इतक्या निधीचे अर्थसहाय्य भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणास उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली होती.

**प्रकल्पाची ठळक वैशिष्टये खालील प्रमाणे आहेत:-**

| | |
|---|---|
| प्रकल्पाची लांबी | २९.९२ कि.मी. (८ पदरी उन्नत मार्ग) |
| धावपट्टीचा प्रकार | Flexible Pavement. |
| मोठे पूल | २ |
| लहान पूल | ९ |
| कल्वर्टस | ५९ |
| उड्डाणपूल | २ |
| प्रकल्प किंमत | रु.७८०७.७५ कोटी |
| प्रकल्प कालावधी | ३६ महिने |
| सवलत कालावधी | २२ वर्षे |

भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत BOT तत्वावर बांधण्यात येणाऱ्या राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६० वरील नाशिक फाटा-खेड आठ पदरी उन्नत मार्गासाठी (८ laned Elevated Corridor) १४.१ हे. भूसंपादन करणे व या प्रकल्पाचा महाराष्ट्र शासनास प्राप्त होणाऱ्या राज्य वस्तु व सेवा कर (State GST) आणि स्वामित्व शुल्का इतके (Royalty) वित्तीय सहाय्य राज्य शासनामार्फत उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार दि.१७.०३.२०२५रोजी मा. मंत्रीमंडळ बैठकीसमोर प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने मा. मंत्रीमंडळ बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय:-**

१. भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६० वरील नाशिक फाटा-खेड आठ पदरी उन्नतमार्गासाठी पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्दीमधील ३.८६९ हेक्टर, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ हद्दीमधील ६.१२८ हेक्टर व पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या हद्दोमधील ४.१०४ हेक्टर अशा एकूण १४.१ हेक्टर जमीनीच्या भूसंपादनास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त भूसंपादनासाठी भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत मूल्यांकन केलेली रक्कम रु.६०० कोटी अथवा विभागाने परीगणित केलेली रक्कम या दोन्ही रक्कमेपैकी कमी रक्कमेइतका निधी भूसंपादनासाठी सार्वजनिक बांधकाम विभागास अतिरिक्त नियतव्ययाद्वारे स्वतंत्रपणे उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. भूसंपादनासाठी तसेच प्रकल्प पूर्ण होईपर्यंत प्रादेशिक अधिकारी, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांची नोडल तथा समन्वयक अधिकारी म्हणून नेमणूक करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. या प्रकल्पातून महाराष्ट्र शासनास प्राप्त होणाऱ्या राज्य वस्तू व सेवा कर (State GST) अंदाजे रु.४७९ कोटी रक्कमेचा परतावा (Refund) देण्यास मान्यता तसेच स्वामित्व शुल्काच्या अंदाजे रु. १०० कोटी रकमेची सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१७१४३१२१६६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=40AE84322C80D3E4EA1B574EB3782ED6CB133B938933BDF197ED5A1551D8622A, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2025.04.17 14:32:26 +05'30'

**(सचिन चिवटे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. उपमुख्यमंत्री, (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास व गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून),यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

७) सर्व मा.मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

९) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.

१०) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

११) महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई.

१२) महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा) नागपूर.

१३) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.

१४) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.

१५) अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.

१६) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.

१७) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.

१८) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.

१९) प्रधान सचिव (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग), मंत्रालय, मुंबई.

२०) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग), मंत्रालय, मुंबई.

२१) प्रधान सचिव (पर्यटन विभाग), मंत्रालय, मुंबई.

२२) प्रधान सचिव (पर्यावरण विभाग), मंत्रालय, मुंबई.

२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२४) सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.

२५) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०.

२६) मुख्य अभियंता, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०.

२७) सर्व सहसचिव/ आंतर वित्तीय सल्लागार तथा उप सचिव/ उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

२८) निवडनस्ती (राम-१).